**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ, सोलापूर येथील मुख्य प्रशासकीय इमारत व परीक्षा भवन बांधकामास तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एसयुएस-२०१८/प्र.क्र.१५५/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२३.

**पहा** :- १) कुलसचिव, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ, सोलापूर यांचे दि.१५.११.२०२२.
२) उच्चाधिकार सचिव समितीची दि.२४.०२.२०२३ रोजीची बैठक.

**प्रस्तावना** : पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांचे देशाच्या इतिहासामध्ये एक उत्तम प्रशासक, पराक्रमी सेनानी, न्यायप्रिय व्यक्ती, त्याचबरोबर असंख्य जनकल्याणकारी कार्य करणारी लोकमाता म्हणून पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर यांची ओळख आहे. अशा या थोर स्त्रीरत्नांचे नाव सोलापूर विद्यापीठास देण्यात आले आहे. विद्यापीठ परिसरात मुख्य प्रशासकीय इमारत व परीक्षा भवन बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याचो विनंती संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये केली होती. सदरहू प्रस्तावाची सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक पडताळणी करुन रु.५४,१९,२५,४५३/- इतक्या किमतीच्या अंदाजपत्रकास मान्यता दिली असून, दि.२४.०२.२०२३ च्या बैठकीत उच्चस्तरीय सचिव समितीने सुध्दा मान्यता दिल्याची बाब विचारात घेता, रु.५४,१९,२५,४५३/- किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर सोलापूर विद्यापीठ, सोलापूर येथील मुख्य प्रशासकीय इमारत व परीक्षा भवन बांधकामाकरीता एकूण रु.५४,१९,२५,४५३/- (अक्षरी रुपये चोपन्न कोटी एकोणवीस लक्ष पंचवीस हजार चारशे त्रैपन्न फक्त) इतक्या खर्चाच्या कामास खालील अटोच्या अधिन राहून तत्वतः प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सविस्तर बाबनिहाय प्रशासकीय मान्यतेचे आदेश उच्चाधिकार समितीच्या बैठकीचे इतिवृत्त अंतिम झाल्यानंतर निर्गमित करण्यात येतील.

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
२. प्रस्तुत काम पुरात्तव विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.
३. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबीच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक.२०१७/प्र.क्र.११/ नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.
५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.
७. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.
८. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

३. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (१७) सोलापूर येथील नवीन विद्यापीठाचा विकास (अनिवार्य) (२२०२ ३५२१), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली मंजूर होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय, दि.२४.०२.२०२३ रोजी मा.उच्चाधिकार समिती (HPC) यांनी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०२१०५१०१५२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.03.02 10:55:31 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सहसंचालक, उच्च शिक्षण, सोलापूर विभाग, सोलापूर.
४) कुलगुरु, पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर सोलापूर विद्यापीठ, सोलापूर.
५) कुलसचिव, पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर सोलापूर विद्यापीठ, सोलापूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे /सोलापूर.
९) वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१०) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (विशि -२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.